**महाराष्ट्र शासन**

**सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग**

**शासन परिपत्रक क्र. अर्थसं-२०१४ /प्र.क्र.९३/१७-स,**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
नविन प्रशासन भवन, १४ वा मजला,
मंत्रालयासमोर, मुंबई ४०० ०३२
तारीख: ९ जानेवारी, २०१५.

वाचा —

१) शासन निर्णय क्रमांकः सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग समक्रमांक , दिनांक ६.५.२०१४. (महाराष्ट्र विनियोजन(लेखानुदान) अधिनियम-२०१४)

२) शासन परिपत्रक, वित्त विभाग क्रमांक : अंदाज २०१४/प्र.क्र.११० /अर्थसंकल्प-३, दिनांक ०१.०७.२०१४.

३) शासन निर्णय समक्रमांक दि. १५.०७.२०१४ ( महाराष्ट्र विनियोजन अधिनियम, २०१४ निधी वितरण...)

४) शासन परिपत्रक, वित्त विभाग क्रमांक: अंदाज २०१३/प्र.क्र.८५/अर्थसंकल्प-३, दिनांक २.१.२०१५

**शासन परिपत्रक :-**

वित्त विभागाच्या संदर्भाधीन ४ येथील परिपत्रकानुसार, सन २०१४-२०१५ चा उर्वरित कालावधी, वितरीत निधी व त्याचा झालेला विनियोग पहाता उर्वरित योजनेतर तसेच योजनांतर्गत अर्थसंकल्पीत निधी खर्च करण्याची मर्यादा वित्त विभागाच्या दि. २ जानेवारी, २०१४ च्या परिपत्रकान्वये आता योजनेत्तरसाठी ८० टक्के व योजनांतर्गतसाठी ६० टक्के एवढी मर्यादा विहित करण्यात आलेली आहे. मात्र, जिल्हा वार्षिक योजना (सर्वसाधारण) मधील अर्थसंकल्पिय तरतूदी (नियोजन विभागाचे अर्थसंकल्पिय अंदाज २०१४-१५ च्या खंड-२ ते ३६) , तसेच आदिवासी विकास विभागाच्या अंतर्गत व सामाजिक न्याय विभागाच्या अंतर्गत असणाऱ्या जिल्हा वार्षिक योजनांचा निधी हा १०० % म्हणजेच पूर्णपणे वितरणास अनुमती देण्यात येत आहे. परिणामी या मर्यादेत अर्थसंकल्पीय तरतुदी विभागास वितरणासाठी उपलब्ध करून देण्यात आल्या आहेत. तथापि खालील प्रकरणात निधी आहरीत करताना वित्त विभागाची पूर्व अनूमती घेणे आवश्यक आहे.

अ) ३१ - वेतनेत्तर सहाय्यक अनुदाने

ब) ३२ - अंशदाने

क) ३३ — अर्थसहाय्य

ड) ३५ - भांडवली खर्चासाठी सहाय्यक अनुदाने

इ) ४५ - व्याज प्रदाने (राष्ट्रीय विकास निगमकडून प्राप्त झालेल्या कर्जावरील व्याज

ई) ५४ - गुंतवणुका

प) ५५ - कर्जे व अग्रिम (७६१० शासकीय कर्मचारी इत्यादींना कर्जे हा भाग वगळून )

फ) ५६ - कर्जाची परतफेड (राष्ट्रीय विकास निगमकडून प्राप्त झालेल्या कर्जाची परतफेड)

ग) याच बरोबर केंद्राचा निधी प्राप्त झाल्याशिवाय आहरित करता येणार नाहीत, अशा केंद्रीय अर्थसहाय्य /अनुदानाशी निगडीत बाबी.

वरील विषयीच्या तरतुदी वित्त विभागाचे सहमतीदर्शक अनौपचारीक संदर्भाचा उल्लेख करून वितरीत कराव्यात.

वित्त विभागाच्या संदर्भांकित दि. २.०१.२०१५ च्या शासन परिपत्रकातील सूचनेनुसार जानेवारी २०१५ ते मार्च २०१५ या तिमाही करीता ०१ वेतन, ०२ मजुरी, ०४ निवृत्तीवेतन विषयक खर्च, ०६ दूरध्वनी, वीज व पाणी शुल्क, १४ भाडेपट्टी व कर, २२ शस्त्रे व दारूगोळा, २४ पेट्रोल, तेल व वंगण, ३४ शिष्यवृत्ती व विद्यावेतने, ३६ सहाय्यक अनुदाने (वेतन), ४५ व्याज, ५६ कर्जाची परतफेड यासाठीच्या योजनेत्तर व योजनांतर्गत तरतूदीच्या ४० टक्के निधी पूर्वीच्या पध्दतीने एकत्रितरित्या वितरीत करण्यात आला आहे. म्हणजेच यासाठी आता १०० टक्के तरतूद उपलब्ध राहील.

वरील अटी व शर्तीच्या अधीन राहून संगणक वितरण प्रणालीवर वितरीत करण्यात येणाऱ्या तरतुदी नियंत्रक अधिकारी यांच्या अधिनस्त सुपूर्द करण्यात येत आहेत. तसेच योजनानिहाय प्रशासकीय मंजुरीचे आदेश स्वतंत्रपणे संबंधित कार्यासनामार्फत निर्गमित करण्यात येतील. ते आदेश प्राप्त झाल्यानंतरच योजनांतर्गत / योजनेत्तर योजनांसाठीचा निधी खर्च करण्याची व संगणक वितरण प्रणालीवरील निधी वितरीत करण्याची कार्यवाही करण्यात यावी.

प्रस्तुत परिपत्रक प्रशासकीय विभागांना प्रदान करण्यात आलेल्या शक्तीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०१०९११३९०२४६०२ असा आहे. हे परिपत्रक डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Vijaykumar Vishnu Dapake

Digitally signed by Vijaykumar Vishnu Dapake
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Co-operation marketing and textiles department, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Vijaykumar Vishnu Dapake
Date: 2015.01.13 12:15:16 +05'30'

(वि. वि. दपके)
अवर सचिव, महाराष्ट्र शासन,

**प्रति,**

१) महालेखापाल, महाराष्ट्र-१, (लेखापरिक्षा/लेखा व अनुज्ञेयता), मुंबई.

२) महालेखापाल, महाराष्ट्र-२, (लेखापरिक्षा/लेखा व अनुज्ञेयता), नागपूर.

३) अधिदान व लेखा अधिकारी , मुंबई

४) सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे.

५) साखर आयुक्त, महाराष्ट्र राज्य, पुणे.
६) पणन संचालक, महाराष्ट्र राज्य, पुणे.
७) संचालक, रेशीम संचालनालय, महाराष्ट्र राज्य, नागपूर.
८) संचालक, वस्त्रोद्योग संचालनालय, महाराष्ट्र राज्य, नागपूर.
९) सर्व जिल्हा कोषागार अधिकारी
१०) वित्त विभाग (अर्थसंकल्प-३, अर्थसंकल्प-१३, व्यय-२, अर्थोपाय), मंत्रालय, मुंबई-३२.
११) नियोजन विभाग (१४३१) मंत्रालय, मुंबई-३२.
१२) सामाजिक न्याय विभाग, विघयो, मंत्रालय, मुंबई-३२.
१३) सर्व सह सचिव /उप सचिव, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग,
१४) विशेष कार्य अधिकारी (श्री.पाटील)
१५) सर्व अवर सचिव , सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग,
१६) सर्व कार्यासन अधिकारी. सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग,
१७) सचिव (सहकार) यांचे स्वीय सहाय्यक.
१८) अपर मुख्य सचिव (वस्त्रोद्योग) यांचे स्वीय सहाय्यक.
१९) अपर मुख्य सचिव (पणन) यांचे स्वीय सहाय्यक.
२०) निवड नस्ती १७-स, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.